**प्रधानमंत्री किसान ऊर्जा सुरक्षा एवं उत्थान महाअभियान (कुसुम) योजना अंतर्गत महाऊर्जाला अनुसुचीत जाती (SCP) घटकाच्या सौर कृषिपंपांच्या लाभार्थ्यांच्या शासन हिस्स्यापोटी सन २०२२-२३ मध्ये अनुदान वितरित करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सौरप्र-२०२२/प्र.क्र. २०७/ऊर्जा-७.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २१ फेब्रुवारी, २०२३.

**वाचा :-**

१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.सौरप्र-२०१४/प्र.क्र.२१९/ऊर्जा-७, दि.२७.०३.२०१५ व दिनांक १४.०६.२०१७
२) शासन निर्णय, उद्योग उर्जा व कामगार विभाग क्र.सौरप्र-२०१९//प्र.क्र.२६८/ऊर्जा-७, दि. १२.०५.२०२१
३) शासन निर्णय, उद्योग उर्जा व कामगार विभाग क्र. बीयुडी-२०२१/प्र.क्र.२२७/ऊर्जा-७, दि. २०.०१.२०२२
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक: अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२.
५) महाऊर्जाचे पत्र क्र. आर.ई.एन./कुसुम योजना/२०२२-२३/सौर/१९९९०, दि. ०१ जून, २०२२
६) शासन निर्णय, उद्योग उर्जा व कामगार विभाग क्र. सौरप्र-२०२२/प्र.क्र.२०७/ऊर्जा-७, दि. २६.०९.२०२२
७) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र. बीजीटी-२०२२/प्र.क्र.६६/अर्थसंकल्प (विघयो), दि. १४.१०.२०२२
८) शासन निर्णय, उद्योग उर्जा व कामगार विभाग क्र. सौरप्र-२०२२/प्र.क्र.२०८/ऊर्जा-७, दि. ०४.११.२०२२
९) महाऊर्जाचे पत्र क्र. लेखा/बीपी-०३४/सौरऊर्जा कृषिपंप(कुसुम-ब)/२२-२३/२०२२-२३/५१५५, दि. २३. डिसेंबर, २०२२
१०) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र. बीजीटी-२०२२/प्र.क्र.६६/अर्थसंकल्प (विघयो), दि. १७.०२.२०२३

**प्रस्तावना :-**

राज्यातील कृषीपंप वीज जोडण्यांचे सौर ऊर्जेद्वारे विद्युतीकरण करण्याच्या अभियानांर्तगत केंद्र शासनाच्या नवीन व नवीकरणीय ऊर्जा मंत्रालय, नवी दिल्ली यांचेकडून शेतकऱ्यांसाठी प्रधानमंत्री किसान ऊर्जा सुरक्षा एवंम उत्थान महाभियान (कुसुम) देशभरात राबविण्यात येत आहे. या अभियानाच्या घटक ब (Componant B) अंतर्गत एकूण १,००,००० पारेषण विरहीत सौर कृषीपंप मंजूर केले असून त्याची अंमलबजावणी महाऊर्जाद्वारे करण्यात येत आहे.

कुसुम योजनेच्या पहिल्या टप्प्यात २४७८ पंप आस्थापित करण्यात आले आहेत. राज्यस्तरीय सुकाणू समितीच्या दि. १० फेब्रुवारी, २०२२ रोजीच्या बैठकीमध्ये वित्तवर्ष २०२२-२३ मध्ये कुसुम टप्पा-२ अंतर्गत ५०,००० नग सौर कृषिपंप आस्थापित करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार कुसुम टप्पा-२ अंतर्गत आस्थापित ३९४०० पंपापैकी सर्वसाधारण वर्गवारीच्या लाभार्थ्यांसाठी ३०५३४ पंप, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडील लाभार्थ्यांसाठी ५३२० पंप व आदिवासी विकास विभागाकडील लाभार्थ्यांसाठी ३५४६ पंप आस्थापित करण्यात आले आहेत. शासन निर्णयानुसार आस्थापित होणाऱ्या सौर कृषीपंपाच्या आदिवासी घटकाच्या लाभार्थ्यांचा राज्य शासनाच्या अनुदानाचा ६५ टक्के हिस्सा उपलब्ध करुन द्यावयाचा आहे.

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता "मागणी क्रमांक. एन-३, मुख्य लेखाशीर्ष-२८१०- सौर कृषीपंप योजना २८१००९९२" या लेखाशीर्षाखाली रु. ८०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. त्यामधून संदर्भिय क्र. ६ येथील शासन निर्णय दिनांक २६.०९.२०२२ अन्वये रु. १६.८० कोटी व क्र. ८ शासन येथील निर्णय दिनांक ०४.११.२०२२ अन्वये रु. १६.८० कोटी निधी महाऊर्जाला वितरीत करण्यात आला आहे.

आता प्रधानमंत्री किसान ऊर्जा सुरक्षा एवंम उत्थान महाभियान (कुसुम) या अभियानाच्या घटक ब (Componant B) अंतर्गत आस्थापित होणाऱ्या पारेषण विरहीत सौर कृषीपंपातील ६५ टक्के शासन हिस्सा देण्यासाठी वित्त विभागाच्या सूचनानुसार अर्थसंकल्पित निधीच्या १०० टक्केच्या मर्यादेत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडे उपलब्ध असलेला रु. ४६.४० कोटी निधी ऊर्जा विभागाला उपलब्ध करुन दिलेला आहे. सदर निधी महाऊर्जाला उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील कृषीपंप वीज जोडण्यांचे सौर ऊर्जेद्वारे विद्युतीकरण करण्याच्या अभियानांर्तगत केंद्र शासनाच्या नवीन व नवीकरणीय ऊर्जा मंत्रालय, नवी दिल्ली यांचेकडून शेतकऱ्यांसाठी प्रधानमंत्री किसान ऊर्जा सुरक्षा एवंम उत्थान महाभियान (कुसुम) देशभरात राबविण्यात येणाऱ्या अभियानाच्या घटक ब (Componant B) अंतर्गत मंजूर एकूण १,००,००० पारेषण विरहीत सौर कृषीपंपापैकी आस्थापित होणाऱ्या पारेषण विरहीत सौर कृषीपंपातील ६५ टक्के शासन हिस्स्यापैकी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडील रु. ४६.४० कोटी (रु. शेहचाळीस कोटी चाळीस लाख फक्त) महाऊर्जाला वितरित करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत असून सदर निधी महाऊर्जाला उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम अदा करण्यासाठी श्री. नारायण कराड, उप सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व श्री. ना. रा. ढाणे, अवर सचिव, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सौर उर्जा कृषिपंप बसविण्याचा कार्यकम अंतर्गत विविध योजनेवरील खर्चाचा, उद्दिष्टे व प्रत्यक्ष साध्यता याबाबतच्या माहितीसह मासिक व त्रैमासिक अहवाल लगतच्या महिन्याच्या १० तारखेपर्यंत महाऊर्जाने शासनास सादर करण्यात यावा. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या निधीची रक्कम केवळ "कुसुम" अंतर्गत अनुसुचीत जाती (SCP) घटकाच्या लाभार्थ्यांसाठी सौर उर्जा कृषिपंप बसविण्याचा कार्यकमाच्या अंमलबजावणीसाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी खर्च करण्यात येईल याची महाऊर्जाकडून खातरजमा करण्यात यावी.

४. सदर निधीच्या लेख्यासंबंधीची कागदपत्रे, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (MEDA), औंध रोड, स्पायसर कॉलेज समोर, पशुसंवर्धन आयुक्तालया शेजारी, औंध, पुणे यांनी आवश्यक तेव्हा महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई यांच्याकडे तपासणीसाठी सादर करावीत.

५. याबाबतचा खर्च "मागणी क्रमांक-एन-३, २८१०, नवीन व नवीकरणीय ऊर्जा, ७८९, अनुसुचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१), अनुसुचित जातीं घटक कार्यक्रमांतर्गत योजना (०१)(०१) मुख्यमंत्री सौर कृषिपंप योजना, (कार्यक्रम) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२८१००९९२)" या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. सौर उर्जा कृषिपंप बसविण्याचा कार्यकम अंतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी सदर निधीच्या लेख्यासंबंधीची कागदपत्रे, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (MEDA), औंध रोड, स्पायसर कॉलेज समोर,

पशुसंवर्धन आयुक्तालया शेजारी, औंध, पुणे यांना निधी वितरीत करतांना वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थस-२०२२/प्र. क्र. ४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ च्या परिशिष्टातील तपासणी अटीची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या संदर्भ क्र. १० येथील शासन निर्णयातील नमूद प्रशासकीय विभागाच्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहेत.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०२२११११४३०२७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANASAHEB RAJARAM DHANE

Digitally signed by NANASAHEB RAJARAM DHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f,
pseudonym=5DD23ACB82750B55FAC0D076A47198885E07A4B6,
serialNumber=6C39E28581500BDFCFE6CD25ED08ADF59F4D2FD8C1EDE1730735F604904BF3BB, cn=NANASAHEB RAJARAM DHANE
Date: 2023.02.23 15:59:21 +05'30'

**( ना. रा. ढाणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. सर्व मंत्री / सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५. सर्व विधानमंडळ सदस्य,विधान भवन, मुंबई,
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक,सर्व मंत्रालयीन विभाग,
१३. सर्व विभागीय आयुक्त,
१४. सर्व जिल्हाधिकारी,
१५. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा,
१६. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
१७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१८. सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, मुंबई (पत्राने),
१९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, सूत्रधारी कंपनी मर्या.,मुंबई,
२०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या.,मुंबई,
२१. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या.,मुंबई,
२२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या.,मुंबई,
२३. महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा),पुणे,
२४. उप सचिव/ ऊर्जा-३, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२५. ऊर्जा उप विभागातील सर्व कार्यासने,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२६. निवड नस्ती,ऊर्जा-७, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.